सैनिकी मुलांमुलींच्या वसतीगृहांतील शासकीय पदे अन्य जिल्ह्यांमध्ये वर्ग करणेबाबत...

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय क्रमांक : सैकवि-२०२३/प्र.क्र.८२/२८
मत्रांलय, मुंबई-४०००३२.
दिनांक - ०३ एप्रिल, २०२४.

**वाचा:-**

१)शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग,क्र. संकीर्ण-१०१९/२७८३/प्र. क्र.२४२/९९/२८, दि. ०९/०३/२००७.

२)शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग,क्र. सैकवि-२००५/१९३५/प्र. क्र.११०/२००६/२८, दि. १२/०६/२००७.

३)शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग,क्र. सैकवि-२०१६/प्र.क्र.३२/२८, दि. ०२/०२/२०२१.

**प्रस्तावना-**

शासन निर्णय दि.०२/०२/२०२१ अन्वये निश्चित करण्यात आलेल्या सुधारित आकृतीबंधापुर्वी सैनिक कल्याण विभाग, पुणे, जिल्हा सैनिक कल्याण कार्यालये, मुलामुलींची वसतिगृहे, सैनिकी आरामगृहे, छात्रपूर्व प्रशिक्षण केंद्र, नाशिक या कार्यालयांच्या एकूण ३९० पदांच्या आकृतीबंधास शासन निर्णय दि. ०९/०३/२००७ अन्वये मान्यता देण्यात आली होती. त्यामध्ये परिशिष्ट-अ व परिशिष्ट-ब मध्ये जिल्हानिहाय पदांच्या वर्गीकरणाबाबतचा तपशिल दर्शविण्यात आलेला होता. परंतू दि. ०२/०२/२०२१ च्या शासन निर्णयात अशा प्रकारचे वर्गीकरण दर्शविण्यात आलेले नाही. त्यामुळे शासन निर्णय दि. ०९/०३/२००७ मधील तपशिलानुसार सैनिक कल्याण विभाग, पुणे यांच्या अधिपत्याखालील कार्यक्षेत्रातील जिल्ह्यांतील मुलांच्या/मुलींच्या वसतिगृहांमध्ये शासकीय पदे कार्यरत आहेत. तथापि सद्यस्थितीत ज्या जिल्ह्यांमध्ये माजी सैनिक/सेवारत पाल्यांची संख्या जास्त आहे अशा जिल्ह्यांमधील वसतीगृहांमध्ये शासकीय पदे वर्ग करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय

शासन निर्णय दि. ०९/०३/२००७ मधील सैनिक कल्याण विभागांतर्गत सैनिकी मुलामुलींच्या वसतीगृहांमधील वसतीगृह अधिक्षक/अधिक्षीका यांच्या जिल्हानिहाय पदांचे वर्गीकरण यामध्ये बदल करण्यात येत असून तो खालील प्रमाणे करण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदनाम | वसतीगृहाचे ठिकाण | पूर्वीचे पद (शासकीय/ अशासकीय) | बदल करण्यात आलेले पद (शासकीय/अशासकीय) |
|---|---|---|---|---|
| १. | वसतीगृह अधिक्षक | सैनिकी मुलांचे वसतिगृह, लातूर. | अशासकीय | शासकीय |
| २. | वसतीगृह अधिक्षक | सैनिकी मुलांचे वसतिगृह, नांदेड. | अशासकीय | शासकीय |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ३. | वसतीगृह अधिक्षक | सैनिकी मुलांचे वसतिगृह, बीड. | अशासकीय | शासकीय |
| ४. | वसतीगृह अधिक्षीका | सैनिकी मुलींचे वसतिगृह, कलीना,मुंबई उपनगर. | अशासकीय | शासकीय |
| ५. | वसतीगृह अधिक्षक | सैनिकी मुलांचे वसतिगृह, पाटण,सातारा. | शासकीय | अशासकीय |
| ६. | वसतीगृह अधिक्षक | सैनिकी मुलांचे वसतिगृह, पन्हाळा, कोल्हापूर. | शासकीय | अशासकीय |
| ७. | वसतीगृह अधिक्षक | सैनिकी मुलांचे वसतिगृह, पंढरपूर, सोलापूर. | शासकीय | अशासकीय |
| ८. | वसतीगृह अधिक्षीका | सैनिकी मुलींचे वसतिगृह, सोलापूर. | शासकीय | अशासकीय |

सदर बदल आदेशाच्या दिनांकापासून लागू राहतील.

२. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२४०४०४१५४४१५०४०७ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

URMILA POPAT SAWANT

Digitally signed by URMILA POPAT SAWANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=532e1c167ebaaff43f5811aa7e45b8f790eb47c4f4cdf5bad586d61ab9901df2, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C586C9348CA72192AB033313815E031BC4374F8A3A8575A392F3FE875E8661EC, cn=URMILA POPAT SAWANT
Date: 2024.04.04 15:57:06 +05'30'

( उर्मिला सावंत )
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे यांचे कार्यालय, रायगड राष्ट्रीय युद्ध स्मारकासमोर, सोलापूर रस्ता, घोरपडी, पुणे-४११००१.
२. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
३. महालेखापाल, (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
४. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
५. महालेखापाल, (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
६. जिल्हाधिकारी, लातूर,नांदेड,बीड,मुंबई उपनगर,सातारा, कोल्हापूर, सोलापूर.
७. जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी, लातूर,नांदेड,बीड,मुंबई उपनगर,सातारा, कोल्हापूर, सोलापूर
८. जिल्हा कोषागार अधिकारी, लातूर,नांदेड,बीड,मुंबई उपनगर,सातारा, कोल्हापूर, सोलापूर
९. निवडनस्ती.